**केंद्र पुरस्कृत स्वाधार योजनेंतर्गत सन २०२०-२१ व २०२१-२२ या वर्षांमध्ये कार्यरत स्वयंसेवी संस्थांचे अनुदान वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- स्वाधार-२०२४/प्र.क्र.४३/का-०३**
नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- २८ मे, २०२४

**वाचा :-**

१. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.२०८/का.०२, दि.२३/०३/२०१८
२. महिला आणि बाल विकास मंत्रालय, केंद्र शासन पत्र दिनांक २७ जून, २०१६ चे पत्र.
३. महिला आणि बाल विकास मंत्रालय, केंद्र शासन पत्र दिनांक १४/७/२०२२
४. महिला आणि बाल विकास मंत्रालय, केंद्र शासन पत्र दिनांक २२/०४/२०२४ व ९/०४/२०२४
५. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. युजेजे-२०२१/प्र.क्र.१४२/का-०३ दि. १५/७/२०२२
६. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. संकिर्ण-२०२३/प्र.क्र.१५४/का-०३ दि. ४ डिसेंबर, २०२३
७. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. केंपुयो-२०२१/प्र.क्र.१२५/का-०३ दि. २९/०३/२०२३

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत स्वाधार योजनेंतर्गत राज्यातील निराधार निराश्रित, नैसर्गिक आपत्तीत/कौटूंबिक हिंसाचारामध्ये बेघर झालेल्या महिलासांठी केंद्र पुरस्कृत स्वाधारगृह योजना राज्यात वाचा क्र. १ येथील शासन निर्णयान्वये राबविण्यात येत होती. सदर योजनेंतर्गत वाचा क्र. २ अन्वये केंद्र हिस्सा ६०% व राज्य हिस्सा ४०% असा अनुदान वितरणाचे निकष होते. सद्यस्थित सदर योजना प्रशासकीय कारणास्तव वाचा क्र. ३ येथील केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनान्वये मिशन शक्ती या कार्यक्रमांतर्गत “सामर्थ्य” या उपघटकांतर्गत असलेल्या “शक्ती सदन” या योजनेमध्ये विलिन करण्यात आली आहे. सद्यस्थितीत केंद्र पुरस्कृत स्वाधार योजनेंतर्गत अनुदान वितरणाबाबत Single Nodal Agency (SNA) खात्यामधून करण्याबाबतची कार्यपध्दती वाचा क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आली आहे.

२. केंद्र शासनाने वाचा क्र. ४ अन्वये स्वाधार योजनेंतर्गत सन २०२०-२१ व २०२१-२२ करिता देय असलेला निधी चालू आर्थिक वर्षामध्ये वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्याअनुषंगाने वित्त विभागाने वितरीत केलेल्या निधीच्या मर्यादेत स्वाधार योजनेंतर्गत केंद्र हिश्श्यापोटी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून सन २०२०-२१ व २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये कार्यरत असलेल्या स्वयंसेवी संस्थांना स्वाधार योजनेंतर्गत देय असलेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत "उज्ज्वला" योजनेंतर्गत सन २०२४-२५ मध्ये राज्य हिश्श्यापोटी रु. ११.७१ इतका निधी हा सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, १०३, महिला कल्याण ०२, स्वयंसेवी संस्थांना सहाय्य (०२) (०८) उज्ज्वला योजना (२२३५ बी९८९) या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. स्वाधार योजनेच्या राज्य हिश्श्याची रक्कम वितरीत करण्याकरिता उज्ज्वला योजनेसाठी अर्थसंकल्पित निधीमधून रु.९२,९१,३८७/- (अक्षरी रुपये ब्याण्णव लक्ष एक्याण्णव हजार तीनशे सत्यांऐशी फक्त ) इतकी रक्कम पुनर्विनियोजित करुन स्वाधार योजनेसाठीच्या सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, १०३, महिला कल्याण ०२, स्वयंसेवी संस्थांना सहाय्य (०२) (१०) स्वाधार योजना (२२३५ सी ०९२) या लेखाशिर्षाखाली रु. ९२,९१,३८७/- अक्षरी रुपये ब्याण्णव लक्ष ऐक्याण्णव हजार तीनशे सत्याऐंशी फक्त ) जमा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. केंद्र पुरस्कृत "उज्ज्वला" योजनेंतर्गत सन २०२४-२५ मध्ये केंद्र हिश्श्यापोटी रु. १७.५६ इतका निधी हा सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, १०३, महिला कल्याण ०२, स्वयंसेवी संस्थांना सहाय्य (०२) (०७) उज्ज्वला योजना (२२३५ बी९७१) या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. स्वाधार योजनेच्या केंद्र हिश्श्याची रक्कम वितरीत करण्याकरिता उज्ज्वला योजनेसाठी अर्थसंकल्पित निधीमधून रु.१,३९,३७,०८१/- (अक्षरी रुपये एक कोटी एकोणचाळीस लक्ष सद्तीस हजार ऐक्याऐंशी रुपये मात्र) इतकी रक्कम पुनर्विनियोजित करुन स्वाधार योजनेसाठीच्या सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, १०३, महिला कल्याण ०२, स्वयंसेवी संस्थांना सहाय्य (०२)(०९) स्वाधार योजना (२२३५सी ०८१) या लेखाशिर्षाखाली रु. १,३९,३७,०८१/- (अक्षरी रुपये एक कोटी एकोणचाळ्ळीस लक्ष सद्तीस हजार ऐक्याऐंशी रुपये मात्र) जमा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. याबाबतचे विवरण पुढील प्रमाणे आहे-

**(रक्कम लाखामध्ये)**

| लेखाशिर्ष | सन २०२४-२५ करिता लेखानुदान तरतुद | परिच्छेद ३ व ४ नुसार उज्ज्वला योजनेंतर्गत सन २०२४-२५ मध्ये अनुदान वितरणा नंतर शिल्लक तरतुद | खर्च | प्रस्तावित पुनर्वियोजनाने घट (-) | प्रस्तावित पुनर्विनियोजनाने वाढ (+) | प्रस्तावित पुनर्विनियोजनानंतरची तरतुद | प्रस्तवित वितरण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (५) | (६) | (७) |
| उज्ज्वला योजना (राज्य हिस्सा ३०%) (२२३५ बी९८९) | ३८६.०० | २९८.८२ | ०.०० | ९२.९१ | -- | २०५.९१ | ०.०० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| उज्ज्वला योजना (केंद्र हिस्सा ६०%)<br>(२२३५ बी९७१) | ५८०.०० | ४०५.६४ | ०.०० | १३९.३७ | -- | २६६.२७ | ०.०० |
| स्वाधार योजना (राज्य हिस्सा ४०%)<br>(२२३५ सी ०९२) | ०.०१ | -- | -- | -- | ९२.९१ | ९२.९२ | ९२.९१ |
| स्वाधार योजना (केंद्र हिस्सा ६०%)<br>(२२३५ सी ०८१) | ०.०१ | -- | -- | - - | १३९.३७ | १३९.३८ | १३९.३७ |

३. उपरोक्त पुनर्विनियोजनानंतर केंद्र पुरस्कृत “स्वाधार” योजनेसाठी सन २०२४-२५ मध्ये उपलब्ध झालेल्या निधीमधून सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, १०३, महिला कल्याण ०२, स्वयंसेवी संस्थांना सहाय्य (०२) (१०) स्वाधार योजना (२२३५ सी ०९२) या लेखाशिर्षाखाली रु.९२,९१,३८७/- (अक्षरी रुपये ब्याण्णव लक्ष एक्याण्णव हजार तीनशे सत्यांऐशी फक्त ) इतका निधी तर सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, १०३, महिला कल्याण ०२, स्वयंसेवी संस्थांना सहाय्य (०२) (०९) स्वाधार योजना (२२३५ सी ०८१) या लेखाशिर्षाखाली रु . १,३९,३७,०८१/- (अक्षरी रुपये एक कोटी एकोणचाळ्ळीस लक्ष सद्तीस हजार ऐक्याऐंशी रुपये मात्र) इतका निधी ३१ सहाय्यक अनुदान वेतनेत्तर या बाबीखाली खर्ची टाकून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. सदर निधी केंद्र पुरस्कृत “शक्ती सदन” योजनेकरिता HDFC बँकेत उघडण्यात आलेल्या Single Nodal Agency (SNA) या खात्यामध्ये थेट जमा करण्यात येईल याबाबतची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी घ्यावी. वाचा क्र. ५ व ६ अन्वये अनुक्रमे केंद्र व राज्य हिश्श्यापोटी Single Nodal Agency (SNA) खात्यावर वितरीत करण्यात आलेला निधी व या शासन निर्णयान्वये केंद्र व राज्य हिश्श्यापोटी वितरीत करण्यात येणा-या निधीचे विवरण खालीलप्रमाणे आहे:

| तपशील | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|
| सध्या स्वाधार योजनेंतर्गत वितरीत करण्यात येणारा निधी | १,३९,३७०८१/- | रु.९२,९१,३८७/- | २,३२,२८,४६८/- |

५. परिशिष्ट “अ” व “ब” मध्ये विहीत केल्याप्रमाणे स्वयंसेवी संस्थांना देय अनुदान (सन २०२०-२१ ते २०२१-२२ पर्यंत एकूण रु. २,३०,१७,८२९/- )त्यांच्या बँक खात्यामध्ये उपरोक्त निधीमधून

वितरीत करण्यात यावे. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना या योजनेकरिता संनियंत्रक तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी विहित नियमानुसार वितरीत करण्याची कार्यवाही सात दिवसाच्या आत पूर्ण करण्यात यावी. व खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

६. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारीक अनौ. संदर्भ क्र. १२२/व्यय-६ दिनांक ८ मे, २०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०५२८१६१४१४८५३० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASAD VINAYAKRAO KULKARNI

Digitally signed by PRASAD VINAYAKRAO KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=83b8be9eb843dd6eccbd6aa4f9eecd0b5f7aca67ff32b2eef7b9ed2d85ab9442, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7D19730DDF785210D50C28934B75E9B7B4F5D06B6181CF1901CE3E48EC9E3985, cn=PRASAD VINAYAKRAO KULKARNI
Date: 2024.05.31 11:26:38 +05'30'

**(प्र. वि. कुलकर्णी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई,
५) मा.मंत्री/ राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७) सर्व विधानसभा सदस्य/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई,
८) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई,
९) सर्व विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ( विधानसभा),
११) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ( विधानपरिषद),
१२) सर्व विभागीय आयुक्त,
१३) आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे,
१४) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई,
१५) सर्व सहायक आयुक्त मागास वर्ग कक्ष, कोकण विभाग, पुणे विभाग, नाशिक विभाग, नागपूर विभाग, अमरावती विभाग, औरंगाबाद विभाग,
१६) सर्व जिल्हाधिकारी,
१७) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१८) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई,

१९) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
२०) प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
२१) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, नागपूर, औरंगाबाद,
२२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
२३) सचिव, राज्य माहिती आयोग,
२४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
२५) राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
२६) सर्व महानगर पालिकांचे आयुक्त,
२७) सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका,
२८) महालेखापाल, महाराष्ट्र ½ (लेखा व अनुज्ञेय) मुंबई /नागपूर,
२९) महालेखापाल, महाराष्ट्र ½ (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर,
३०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
३१) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
३२) सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
३३) सर्व मंत्रालयीन विभाग, त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना सदर पत्राची प्रत, त्यांच्या स्तरावरुन स्वतंत्रपणे पाठवून कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात याव्यात.
३४) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
३५) सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये, महाराष्ट्र राज्य,
३६) निवडनस्ती, महिला व बाल विकास विभाग ( कार्यासन -०३).

| सन २०२०-२१ या वर्षामध्ये स्वाधार योजनेंतर्गत प्रलंबित अनुदान असलेल्या स्वयंसेवी संस्था परिशिष्ट- "अ" | | | | |
|---|---|---|---|---|
| अ.क्र | संस्थेचे नाव | केंद्र हिस्सा (60 टक्के) | राज्य हिस्सा 40 टक्के | एकूण |
| १) | असोशिएशन फॉर सोशल हेल्थ इन इंडिया, मुंबई | १,२३,९०७ | ८२,६०५ | २,०६,५१२ |
| २) | भगिनी निवेदीता प्रतिष्ठान सांगली | ३,८१,३५८ | २,५४,२३९ | ६,३५,५९७ |
| ३) | मिनाक्षी महिला मंडळ नाशिक | २,३६,८८४ | १,५७,९२२ | ३,९४,८०६ |
| ४) | प्रियदर्शनी ग्रामीण आदिवासी सेवाभावी संस्था, दिपराज कॉम्लेक्स, संगमनेर, अहमदनगर | ७,५५,०१४ | ५,०३,३४३ | १२,५८,३५७ |
| ५) | प्रियदर्शनी ग्रामीण आदिवासी सेवाभावी संस्था, गोल्डन सिटी संगमनेर, अहमदनगर | २,३७,९४३ | १,५८,६२९ | ३,९६,५७२ |
| ६) | भारतीय आदिमजाती सेवक संघ, अहमदनगर | २,१८,३२७ | १,४५,५५१ | ३,६३,८७८ |
| ७) | नागपूर मुस्लिम वेल्फेअर सोसायटी, भंडारा | ६,४४,२१४ | ४,२९,४७६ | १०,७३,६९० |
| ८) | उज्ज्वल गोडवना महिला मंडळ, वर्धा | २,००,५९४ | १,३३,७३० | ३,३४,३२४ |
| ९) | लोकमंगल संस्था, गडचिरोली | १,५९,७६३ | १,०६,५०९ | २,६६,२७२ |
| १०) | रेणूका चॅरिटेबल ट्रस्ट, गडचिरोली | ५४,१५२ | ३६,१०१ | ९०,२५३ |
| ११) | सरस्वती शिक्षण महिला मंडळ चंद्रपूर | ६,५२,५२० | ४,३५,०१३ | १०,८७,५३३ |
| १२) | राजश्री शाहू महाराज शिक्षण संस्था, चंद्रपूर | १,५५,३९२ | १,०३,५९४ | २,५८,९८६ |
| १३) | भारतीय आदिमजाती सेवक संघ, नागपूर नवी दिल्ली | ५,२४,३७७ | ३,४९,५८४ | ८,७३,९६१ |
| १४) | महात्मा गांधी विचार संवर्धन संस्था, नागपूर | १,३९,२०० | ९२,८०० | २,३२,००० |
| १५) | पटेल बहुउद्देशिय शिक्षण संस्था नागपूर | १,४७,००० | ९८,००० | २,४५,००० |
| १६) | ग्रामीण विकास संशोधन व प्रतिष्ठान संस्था, नागपूर | १,३६,०९२.०० | ९०,७२८.०० | २,२६,८२०.०० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १७) | बाल विकास महिला मंडळ स्वाधार केंद्र लातूर. | १,८१,००५.६० | १,२०,६७०.४० | ३,०१,६७६.०० |
| १८) | पिपल्स एज्युकेशन सोसायटी, बुलढाणा नारी स्वाधार सेंटर, बुलढाणा. | ३९,५२३.२ | २६,३४८.८ | ६५,८७२ |
| १९) | स्वयंसिध्दा महिला मंडळ शॉर्ट स्टे होम लातूर | २,३३,८८२.४ | १,५५,९२१.६ | ३,८९,८०४ |
| २०) | स्वयंसिध्दा महिला मंडळ स्वाधार केंद्र, लातूर | २,६१,४६९.२ | १,७४,३१२.८ | ४,३५,७८२ |
| २१) | चैतन्य महिला मंडळ, पुणे | ७,१३,३५७.४ | ४,७५,५७१.६ | ११,८८,९२९ |
| २२) | कै. मधूकरराव अवघाते प्रतिष्ठान, मुर्तीजापूर, अकोला. | २,६६,७३२.४ | १,७७,८२१.६ | ४,४४,५५४ |
| २३) | पिपल्स एज्युकेशन सोसायटी, बुलढाणा सावित्रीबाई फुले स्वाधारगृह, बुलढाणा. | १,१३,३३८.२ | ७५,५५८.८ | १,८८,८९७ |
| २४) | कै. श्रीम. जानकाबाई (अक्का) तेंडुलकर महिला आश्रम, रत्नागिरी | १,१६,२६१.४ | ७७,५०७.६ | १,९३,७६९ |
| २५) | मागास जनसेवा समिती, बदामे कॉम्पलेक्स, सोलापूर | ६,२४,८७० | ४,१६,५८० | १०,४१,४५० |
| २६) | अहील्यादेवी शिक्षण प्रसारक व बहुउद्देशिय मंडळ, वाशिम. | ३,२६,४० | २१,७६० | ५४,४०० |
| २७) | ग्रामीण विकास मंडळ बनसोराळा बीड | ५,८१,६०० | ३,८७,७७३ | ९,६९,३७३ |
| २८) | ग्रामीण विकास मंडळ बनसोराळा, बीड | २,९०,८००.२ | १,९३,८६६.८ | ४,८४,६६७ |
| | **एकूण** | **८२,२२,२१७/-** | **५४,८१,५१७** | **१,३७,०३७३४** |

| सन २०२१-२२ या आर्थिक वर्षांतील प्रलंबित अनुदान. (स्वाधार योजना)<br>परिशिष्ट- "ब" | | | | |
|---|---|---|---|---|
| अ.क्र | संस्थेचे नाव | केंद्र हिस्सा (६० टक्के) | राज्य हिस्सा ४० टक्के | एकूण |
| १ | भगिनी निवेदीता प्रतिष्ठान सांगली | १,६१,५३८ | १,०७,६९२ | २,६९,२३० |
| २ | रचना ट्रस्ट, नाशिक | ७,५५,७८२ | ५,०३,८५५ | १२,५९,६३७ |
| ३ | प्रियदर्शनी ग्रामीण आदिवासी सेवाभावी संस्था, दिपराज कॉम्लेक्स, संगमनेर, अहमदनगर | ७,३५,७७० | ४,९०,५१३ | १२,२६,२८३ |
| ४ | नागपूर, मुस्लिम वेल्फेअर सोसायटी, भंडारा | ६,२८,८३१ | ४,१९,२२१ | १०,४८,०५२ |
| ५ | सरस्वती शिक्षण महिला मंडळ, चंद्रपूर | ६,९५,८५९ | ४,६३,९०६ | ११,५९,७६५ |
| ६ | भारतीय आदिमजाती सेवक संघ, नागपूर नवी दिल्ली | ५,६०,७६८ | ३,७३,८४५ | ९,३४,६१३ |
| ७ | चैतन्य महिला मंडळ, पुणे | ६,८५,१५३ | ४,५६,७६९ | ११,४१,९२२ |
| ८ | कै. मधूकरराव अवघाते प्रतिष्ठान, मुर्तीजापूर, अकोला. | ४,९२,३५५.८ | ३,२८,२३७.२ | ८,२०,५९३ |
| ९ | ग्रामीण विकास मंडळ बनसोराळा बीड | ८,७२,४०० | ५,८१,६०० | १४,५४,००० |
| | **एकूण** | **५५,८८,४५७** | **३७,२५,६५७** | **९३,१४,०९५** |